**एकत्रित प्रशिक्षण कार्यक्रम.**

**वित्तीय वर्ष २०२१-२२ करीता वनामती, नागपूर या प्रशिक्षणसंस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता अनुदान वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक- ससप्रे-४४१९/प्र. क्र.१८९/प्रशा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ५ जानेवारी ,२०२२

**संदर्भ :-**

१) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्रमांक- टिआरएन ०६१८/प्र.क्र.५१/सीपीटीपी-ब, दिनांक १७.०८.२०१९

२) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्रमांक- टिआरएन ०६१८/प्र.क्र.५७/सीपीटीपी-ब, दिनांक १७.०१.२०२०

३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. विंदूना-३०१६/प्र.क्र.२००/प्रशा-२, दिनांक १७.११.२०१७

४) शासन शुध्दीपत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. विंदूना-३०१६/प्र.क्र.२००/प्रशा-२, दिनांक १२.१२.२०१७

५) वनामती नागपूर यांचे पत्र क्र. वनामती/सीपीटीपी/४अ-५-६/तां.प्रशि/प्रतिपूर्ती/३०५४, दिनांक २३.०१.२०२०

६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. ससप्रे-४४१९/प्र. क्र.१८९/प्रशा-२, दिनांक १३.०७.२०२१

७) वनामती नागपूर यांचे पत्र क्र. वनामती/सीपीटीपी/उप.शि.//तां.प्रशि/प्रतिपूर्ती/३०५४, दिनांक १६.१२.२०२१

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी विभागातील प्रशिक्षण योजनेकरिता रु.३.०० कोटी इतकी तरतूद मंजूर व अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. वनामती नागपूर यांनी त्यांच्या दिनांक २३.०१.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सीपीटीपी ४अ, ५ व ६ अंतर्गत उपशिक्षणाधिकारी, गट-ब या संवर्गातील प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांचे तांत्रिक प्रशिक्षणाची रु १११.७२ लक्ष खर्चाची प्रतिपूर्ती करण्याबाबत विनंती केली होती. त्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमा ४अ, ५ व ६ अंतर्गत वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर यांना दिनांक १३.०७.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये ४०% रक्कम रुपये ४४,६८,०००/- ( रुपये चव्वेचाळीस लक्ष अडुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. आता उर्वरीत ६०% निधी रुपये ६७,०४,०००/- (रुपये सदुसष्ट लक्ष चार हजार फक्त ) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम ४अ, ५ व ६ अंतर्गत रुजू झालेल्या एकूण ५७ परिविक्षाधिन उपशिक्षणाधिकारी, गट-ब यांचे तांत्रिक प्रशिक्षण कार्यक्रमासाठी रु.१,११,७२,०००/- ( रुपये एक कोटी अकरा लक्ष बाहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती) नागपूर यांना वितरीत करणे आवश्यक आहे. त्यापैकी ४०% इतका निधी रुपये ४४,६८,०००/- ( रुपये चव्वेचाळीस लक्ष अडुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे उर्वरीत ६०% निधी रुपये ६७,०४,०००/- (रुपये सदुसष्ट लक्ष चार हजार फक्त ) वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्र. ई-३, २२५१- सचिवालय व सामाजिक सेवा, २२५११००२-५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२१-२२ या वित्तिय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या मान्यतेने व अनौपचारीक संदर्भ क्र.५६४/२०२१/व्यय-५, दिनांक २२.०६.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२२०१०५१५५५४४०१६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a8b4d56939f92ca00d0f1036f37e5c0743e0f0aea72b2f23cc46d5945ab37d69, pseudonym=0BFE14F7A1A9C39851527D3E05D62CA529C327D7, serialNumber=8E3FEAC5ACB11AE3D9464A8A336D7067314E8F58B632FCBB7B5B4CF900C4649B, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2022.01.05 15:55:42 +05'30'

**( दीपक शेलार )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल - १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल - २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
४. महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.

८. महासंचालक, वंसतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.
११. कक्ष अधिकारी (प्रशा-५), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा - १), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती.